*: मांडणी व सजावट :*
*शशिकांत रणवरे (ठाणे)*

# मैत्रबन

भाग - १




: संपर्क :

ई साहित्य प्रतिष्ठान

जी ११०२, ईटर्निटी,

मॅरेथॉन चौक

ठाणे – ४००६०४

९८६९६७४८२०


हा अंक विनामुल्य मिळण्यासाठी
तसेच सूचना, अभिप्राय
व प्रतिक्रियांसाठी


netaksharee@gmail.com

ई साहित्य प्रतिष्ठान

नमस्कार मित्रहो,

काही दिवसांच्या विश्रांतीनंतर पुन्हा तुमच लाडकं ई-साप्ताहीक "नेटाक्षरी" तुमच्या समोर ठेवताना खुप आनंद होत आहे. नेटाक्षरीच्या आत्तापर्यंतच्या सर्व अंकाना तुम्ही भरभरून प्रतिसाद दिलात त्यासाठी तुमचे मनापासुन आभार . तुमच्या सतत मिळणाऱ्या अभिप्राय आणि प्रोत्साहनामुळे आपल हे नात नेटाक्षरी च्या माध्यमातुन असचं पुढे अबाधीत चालु रहील याचा विश्वास वाटतो.

नेटाक्षरीच्या या अंकाचा विषय आहे "मैत्री". नुकताच आपण जागतिक मैत्री दिन साजरा केला. आपल्या आयुष्याच्या प्रत्येक टप्प्यावर सावलीप्रमाणे आपले सोबत करणारे, आयुष्याच्या जडण घडणीच्या प्रवासाचे खरे साक्षीदार असलेले, अनेक चांगल्या वाईट प्रसंगात आपल्याला बरोबर उभे ठाकलेले आपले मित्र व त्यांच्या मैत्रिला सलाम करण्याचा दिवस.

पण या अंकातील कविता मैत्री या विषयावर नाहीत तर त्या आहेत "कविता" या एकाच धाग्याने जोडल्या गेलेल्या कवि मित्रांच्या. मुबंई , ठाणे, नाशिक, पुणे आणी अशा अनेक शहरात वास्तव्यास असलेली ही तरूण कवी मंडळी कवितेवरचं आपलं प्रेम तर टिकवुन आहेतच पण त्यांची मैत्रीही तितकीच बहरत गेली आहे. मराठी भाषेला जागतिक दर्जा मिळवुन देण्याच स्वप्न पाहत आणी आपल्या व्यस्त दिनचर्येतुन वेळ काढत, आपल वैयक्तीक आयुष्य जपत ही मंडळी आपली मैत्री टिकवुन आहेत.

हा अंक समर्पित अशाच मित्रांना आणी त्यांच्या मैत्रिला

शशिकांत रणवरे

टीम नेटाक्षरी

नेटअक्षरी

जरा जरासा ...
जरा जरासा ...

श्वासात तू सुगंधा दरवळ जरा जरासा
ये ओंजळीत माझ्या ओघळ जरा जरासा.

तो गंध पाकळ्यांचा आता हवा कशाला ?
माळून घे मला तू चुरगळ जरा जरासा !

तू सोड राजसा हे नजरेतले इशारे
हो पापण्यात माझ्या काजळ जरा जरासा.

हे उन्मळून आले श्वासात आज वारे
दे पालवी नवी तू सळसळ जरा जरासा.

गुंतून जा सख्या रे या कुंतलात माझ्या
माझ्या नसा नसांनी साकळ जरा जरासा.

उसळून ये असा तू उधळून जा किनारे
माझ्या मिठीत हो तू वादळ जरा जरासा.

ये तू भरून मेघा मन हे तहानलेले
होऊ नको रिता तू कोसळ जरा जरासा !



उघडून बंद दारे बघ आरसा नव्याने
हा चेहरा जुना तू हातळ जरा जरासा !

होता पुरा कधी तू पदरात सांग माझ्या ?
मी मागते तुला रे केवळ जरा जरासा !

**सुधीर मुळीक**
**(मुबंई)**

साहित्य प्रतिष्ठान

# निर्जीवत्वाचे अवशेष

त्याला झेपलं, त्याला रुचलं
काहीकाळाने पचलं
म्हणून त्याच्या समोरच्या वाडग्यात पडला
दमड्यांचा ढीग
ज्याचा आवाज लक्ष वेधून घेई
येत्या जात्या उथळ खिशांचे
त्याच्या खळगी पडल्या पोटाकडे
नंतर व्हायच्या दीड दोन दमड्या
इकडच्या तिकडे
खोल खिशांची माणसे
चूकलं...
(या कवितांमध्ये जीवंत असं काही नाही )
असो.. खोल खिसे
हळहळते सुस्कारे टाकत जायचे
त्या वाडग्यात, दमड्यांच्या सोबतीने
खोल मनाचे उथळ खिसे मात्र
तिरस्कारांच्या नजरांसोबत
भरल्या पोटचे तत्वद्न्यान सुद्धा टाकत
दुसरं शेजारचं वाडगं मात्र
सवयीने रिकामच रहायचं
त्याच्या मागच्या भिंती मात्र
रंगत रहायच्या
नवनव्या नक्ष्यांनी, रंगांनी
त्या वाडग्यात असायचे
रंग कालवल्याचे सुकले डाग
अगदीच रिकामं नसायचं ते
इतरत्र पचापच तंबाखू
थुंकणारी पानं
ती भिंत मात्र ओलांडून जायची

*आनंद माने (मुबंई)*

## कितीक तु, कितीक मी

*कितीक तु, कितीक मी, कितीकशा अश्या कथा*
*कल कि शाम थी यही, अब आज 'शाम' लापता..//*

*खोजता चला चलु, तो यह परछाई क्यो जले ?*
*तरी बरे...,तु ठेवलीस ही नभावरी निळी फ़ुले...//*

*ए आठवते का रुसताना, तुझेही व्हायचे असे ?*
*तब जलती थी खामोशी, अब चलती भी दुरसे..//*

*तभी से मुंतिजर सूर, इन बेलिबास शाखं पर*
*भर पाचोळा गुण-गुण दिलीस तू हाक जर...//*

*तशी अजुन बांधीलच या वा-याला °ती° शपथ*
*तु मिले न भी मिले तो करे चांदसे दस्तखत...//*

*तु नही तो ये आसमां तेरी ये शाम लिख चला*
*तुझ्याशिवाय लिहिणेही, अजुन चालते तुला?...//*

*होती तनहाई सिंदुरी, उसकी भी क्या खता*
*कितीक तु, कितीक मी, कितीकशा अश्या कथा...//*

***सचिन काकडे*** *[ मुबंई]*

ई साहित्य प्रतिष्ठान

# ही घडी दे !!!

चांदण्याचा दाहदायी ज्वर नको !

एक फ़ुंकर.......! मोतियांची सर नको !!

रोमरोमी स्पर्श चंदन-केवडा !

दे मिठी दे.......! वेंधळा जर-तर नको !!

धुंद तू ही , धुंद शेजी मोगरा !

श्वास हळवे......! बोलण्याची भर नको !!

रांगडा मल्हार तू छेडीत जा !

मारवा वा.... आर्ततेचा स्वर नको !!

मीलनांती ना उरावी भिन्नता !!

एक रुपे..........! व्यर्थ मादी-नर नको !!

ध्रुवतारी स्थान सजणा स्पंदनी !

ही घडी दे........! कोणताही °वर° नको !!

सुप्रिया जाधव (पुणे)

# रात्र

आरंभ वेदनेचा झाला कधी कळेना
अंतास हलकीशी चकवून रात्र गेली
.
निःशब्द स्पर्श त्याचा क्षण गोठवून गेला
मग नेत्र बोलले अन विरघळून रात्र गेली
.
चकमकीत श्वासांच्या गाफील डाव त्याचा
अन खोल त्या खळीत हरवून रात्र गेली
.
सजवून तारकांना उर रंध्रात माझ्या
चंद्रास ह्या नभावर उतरवून रात्र गेली
.
ती वेळ थांबली अन तो काळही थांबला
नाजूक त्या क्षणांना विस्कटून रात्र गेली
.
रंगात रंगला तो मग रंग कुंकवाचा
भाळी नवी शलाका कोंदून रात्र गेली
.
.
-------
भारती सरमळकर (मुबंई)



ई साहित्य प्रतिष्ठान

# यार शायर.......

चंद आंसू चंद नगमे .. हैं कमाई आप की
यार शायर..अब ठिकाने  अक्ल आई आप की
.
ऐसे मौसम में कोई .. गजलें नहीं तो क्या कहे..
रात भी हैं.. चाँद भी हैं.. और जुदाई आप की..
.
उम्र भर मरते रहें जिन की भलाई के लिए..
लोग जी लेते हैं वो.. कर के बुराई आप की..
.
रास्तें रुकते नहीं.. और मंजिलें दिखती नहीं..
देखिये क्या रंग लाइ.. रहेनुमाई आप की..
.
मुन्तजीर कोई नहीं अब.. उस गली में आप का..
जिस गली ने थी कभी.. रातें जगाई आप की..
.
हैं ख़याल उनका.. तो गजलें आप की हो क्यूँ 'समीर'
सिर्फ.. लफ्ज ओ' कागज़ ओ' खामा ओ' स्याही आप की...

*समीर सामंत  (मुबंई)*

## सामाजिक इत्यादी..

*आता आमचे खवळत नाही रुधिर बिधिर इत्यादी*
*किंवा धमन्यांतुन वाहत आहे गटार गढुळ इत्यादी*

*रस्ते कच्चे,ओता डांबर डोक्यावर पाऊस उभा*
*नव्या निविदा,जुनेच खड्डे, छप्पाक-बिप्पाक इत्यादी*

*शहरात नव्या भटकुन विसरलो वाटा येण्या-जाण्याच्या*
*कमानीवरी हॅप्पी बड्डे ,दादा,भाऊ इत्यादी*

*त्या वळणावर दोन्ही आहे देऊळ आणि गुत्ताही*
*कुणी ठेवतो म्हणता -वरती हिशोब बिशोब इत्यादी*

*-यंदाचा पाऊस निमुट आहे खाते म्हणते वेधाचे*
*का शहरावर गोळा काळे आभाळ बिभाळ इत्यादी*

*जामीन किंवा फ़रार होणे जुने पैतरे चोरांचे*
*आगीत कागद स्वाहा-बोंबला! सर्कीट-बिर्किट इत्यादी*

*नवी पुरवणी सुसाईड्यांना आता बहाल केलेली*
*टिव्ही,नेटची म्हणे जाहली प्रगती बिगती इत्यादी*

*काय लावली शक्कल भक्ताने देवाच्या तस्बीरीची*
*कमी रंगते भिंत जिन्याची थुंकी-बिंकी इत्यादी*

*(महाराष्ट्राच्या ताठ कण्याने सुवर्णपाने लिहलेली*
*तरी दिल्लीला खुर्चीसाठी लेचेपेचे इत्यादी )*

*आज सकाळी स्वप्न समुद्री तरंगतांना सापडले*
*काल पुलावर बरळत होते शासन बिशन इत्यादी*

*प्राजक्त देशमुख (नाशिक)*

ई साहित्य प्रतिष्ठान

# काही क्षण आपले नसतातच...

आपण हात पुढे करतो...तसे....ते थरथरतात  आपल्या बोटांच्या चिमटीत ....
एखाद्या प्रकाश झोतातून तरंगणा-या रंगीत धूलिकणासारखे
या बोटांवरुन त्या बोटावर क्षण भर अडकून...... विरून जातात...क्षण....
काही क्षण आपले नसतातच...

मग तोच हात....तीच बोटं.... आपण मोकळी करतो....
तसे ते...भिरभिरतात...फुलपाखरासारखे...आपल्या तळाव्याभोवती....
अन इथून तिथे तिथून इथे क्षण भर उतरून...... उडून जातात...क्षण...
काही क्षण आपले नसतातच...

मग पसरावा तोच तळवा....जोडावा दुस-या तळव्याशी....
होईल मग एक.... ओंजळ.... लगेच धरावी ती... आभाळाखाली...
आपापल्या नशिबात असतील तेवढे थेंब साठवण्यासाठी...
थेंब खेळतात ...इथे तिथे....क्षणभरच आणि ओघळून जातात...क्षण...
काही क्षण आपले नसतातच...

मग...हळू हळू कळायला लागतात आपल्याला आपल्या मर्यादा,
आपले हक्क, आपली कर्तव्य आणि आपलं अस्तित्व...
तोच हात, तीच बोटं, तोच तळवा, तीच ओंजळ.......
धरावी, आपल्या चेह-यासमोर.....
झाकून घ्यावे स्वार्थाने, अपेक्षेने, हव्यासाने....बरबटलेले - क्षण
काही क्षण आपले नसतातच...

अश्रू झरलेच....तर....धुवून जाईल....
तेवढ्यापुरतं मनावर साचलेलं
अपराधीपणाचं मळभ...... पण.....
भिजणार नाही ....विझणार तर नाहीच  नाही,
आत कुठे तरी.....जळत राहील....
खोल खोल....न संपणा-या एखाद्या शापा सारखं - वास्तव

खरच..... काही क्षण आपले नसतातच...
किंवा आपण तरी असतो...फक्त काही क्षणांपुरतेच !!!

***-- मंदार चोळकर (मुबंई)***

ई साहित्य प्रतिष्ठानची सुमारे अडिचशे पुस्तकं गेल्या साडेतीन वर्षांत प्रकाशित झाली. आणि सव्वालाख वाचकांनी त्यांचा आनंद घेतला. या शिवाय  ई साहित्य प्रतिष्ठानच्या वेबसाईट्सना व्हिजिट देणाऱ्यांची संख्या तीन लाखांच्या घरात आहे. आणि या सर्वाची सुरुवात झाली ती कवितांच्या एका छोट्याशा नियतकालिकातून, नेटाक्षरीतून. आज नेटाक्षरीचा हा अंक  आपल्या हाती देताना आम्हाला अभिमान वाटतो. मराठी ही कवितांची आणि गाण्यांची भाषा. मराठी मन म्हणजे रसिक, कवितेचा आनंद घेणारे.  आपल्या प्रतिसादाने कवींना मिळणारी ऊर्जा त्यांचा उत्साह वाढवते. कृपया आपल्या प्रतिक्रिया पाठवीत रहा. कवींना आवाहन आहे, आपल्या नवनवीन कविता पाठवत रहा. आमच्या वाचकांना त्यांचा आनंद घेऊ द्या.